मा. मुंबई उच्च न्यायालय व त्यांचे खंडपीठे करीता व्हिडिओ कॉन्फरन्सद्वारे न्यायालय चालविण्यासाठी ७० Zoom Licenses खरेदी प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र. संप्रिसा- २०२२/प्र.क्र.६३/का. ७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १७ जुलै, २०२३.

**संदर्भ**:- १) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. Com./Sec./४५/२०२२, दिनांक ०१.१०.२०२२.
२) समक्रमांकाचे शासन पत्र दिनांक १६.१०.२०२२.
३) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. Comp/Sec/१५/२०२३, दिनांक १९.०४.२०२३, दि. ०७.०६.२०२३.
४) विभागाच्या दिनांक ३०.०६.२०२३ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना** :-

केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांनी मुंबई उच्च न्यायालय व त्यांचे खंडपीठे करीता व्हिडिओ कॉन्फरन्सद्वारे न्यायालय चालविण्यासाठी ७० Zoom Licenses खरेदी करण्याकरीता संदर्भ क्र. १ अन्वये प्रस्ताव शासनास सादर केला होता. सदर प्रस्तावास माहिती तंत्रज्ञान संचालनालयाचे अभिप्राय घेण्यात आले असून, विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक ३०.०६.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. यानुषंगाने मुंबई उच्च न्यायालय व त्यांचे खंडपीठे करीता व्हिडिओ कॉन्फरन्सद्वारे न्यायालय चालविण्यासाठी ७० Zoom Licenses खरेदी करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

मुंबई उच्च न्यायालय व त्यांचे खंडपीठे करीता व्हिडिओ कॉन्फरन्सद्वारे न्यायालय चालविण्यासाठी ७० Zoom Licenses करीता दिनांक ०३.०९.२०२३ ते ३१.०३.२०२४ या कालावधीच्या रु.७,६१,७३७/- (अक्षरी रु. सात लक्ष एकसष्ट हजार सातशे सद्तीस फक्त) इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर ७० Zoom Licenses खरेदीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

| Sr. No. | Particulars | Rate per Unit Rs. | GST @ 18% Rs. | Total Amount (inclusive of Taxes) |
|---|---|---|---|---|
| 1. | 70 Nos. of Zoom std. Enterprise License for six months (incl. Webinar Licenses of 500 attendees) | 18,444.00/- | 3,319.92/- | **7,61,737.20/-** |

३. सदर खरेदी उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय दिनांक ०१.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार शासनाच्या विहित पध्दतीने करण्यात यावी.

४. याप्रित्यर्थ होणारा खर्च “मागणी क्र.जे-१, २०१४-न्यायदान, (००) १०२-उच्च न्यायालय, (०३) अपील शाखा, (०३) (०१) प्रबंधक अपील शाखा (भारित) (२०१४ ००९२)” या लेखाशीर्षातील “१७-संगणक खर्च” या उदिष्टांतर्गत मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७१८१२३९२५१२१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDKISHOR LALLU MORE

Digitally signed by NANDKISHOR LALLU MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=8e6e6ef027afaf311b73f55b93d66802f7572a9502432 8e2d647f7ef65a9432a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69426D4C260E75A2AE012E47A93A468B42FD 9B82A0B40FBCADEA1F0C509379CC, cn=NANDKISHOR LALLU MORE
Date: 2023.07.18 12:40:19 +05'30'

**( नंदकिशोर ल. मोरे )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव.**

**प्रति,**

१. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
३. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता),-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९. अधिदान व लेखा अधिकारी, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ, चर्चगेट, मुंबई-२०.
१०. संचालक, लेखा व कोषागारे, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.
११. कार्यासन अधिकारी-४, २३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. निवडनस्ती/का. ७